वसई विरार उपप्रादेशिक पाणी पुरवठा योजनेकरिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून घेतलेल्या कर्ज परतफेडीसाठी अनुदान (४२१५ ०१२५)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. मजीप्रा-२०१८/प्र.क्र.१०४/पापु-०४**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : १४ ऑगस्ट, २०१८.**

वाचा :-

१. शासन निर्णय क्र.पा.पु.स्व.वि .,पापुयो-११०१/प्र.क्र.२४५/पापु-१८, दि. १०.०६.२००२.
२. शासन निर्णय क्र.पा.पु.स्व.वि .,पापुयो-११०५/प्र.क्र.५१/पापु-१८, दि. २४.०५.२००५.
३. शासन निर्णय क्र.पा.पु.स्व.वि .,पापुयो-२००४/प्र.क्र.८५६/पापु-०४, दि. १२.०६.२००६.
४. शासन निर्णय क्र.पा.पु.स्व.वि .,पापुयो-११०६/प्र.क्र.३८१/पापु-०४, दि. १५.०१.२००८.
५. शासन निर्णय क्र.पा.पु.स्व.वि .,पापुयो-२००८/प्र.क्र.६५/पापु-०८,दि. २६.०३.२००९.
६. शासन निर्णय क्र.पा.पु.स्व.वि .,पापुयो-२०१४/प्र.क्र.६५/पापु-०४, दि.०५.११.२०१५.

**प्रस्तावना :-**

वसई विरार उपप्रादेशिक पाणी पुरवठा योजनेसाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकारणाने संदर्भाधिन दिनांक १०.०६.२००२ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार मुंबई महानगर विकास प्राधिकरणाकडून उभारलेल्या कर्जावरील मुद्दल व व्याजाच्या परतफेडीसाठी सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पात एकूण रुपये ३२,५४,४५,००० ( रुपये बत्तीस कोटी चौपन्न लाख पंचेचाळीस हजार फक्त ) एवढी तरतूद करण्यात आलेली आहे. गतवर्षी वित्त विभागाने शेतकरी कर्जमाफीसाठी निधीची आवश्यकता असल्याने, डिसेबर, २०१७ मधील देय असलेल्या हप्त्याची रक्कम उपलब्ध करुन दिलेली नसल्याने, त्याची तरतुद सन २०१८-१९ च्या अर्थसकल्पात करण्यात आली होती. त्यामधून सदर लेखाशिर्षाखाली आतापर्यंत रुपये १६,८२,७१,७०१/- इतका खर्च झालेला आहे. आता विभागाकडे सन २०१८-१९ मध्ये सदर प्रयोजनासाठी रुपये १५,७१,७३,२९९ इतका निधी उपलब्ध आहे.

२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने केलेल्या परिगणनेनुसार मुदतपूर्व परतफेडीसाठी म्हणजेच दिनांक ३१.०८.२०१८ रोजी मुद्दल व व्याजाच्या परतफेडीसाठी एकूण रुपये १५,७०,३४,५४५/-(रुपये पंधरा कोटी सत्तर लाख चौतीस हजार पाचशे पंचेचाळीस फक्त ) इतकी रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास चालू वर्षात म्हणजेच २०१८-१९ मध्ये वितरीत करावयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

वसई विरार उपप्रादेशिक पाणी पुरवठा योजनेसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने दिनांक ०४.०३.२०१० ते १३.०३.२०१४ या कालावधीत घेतलेल्या कर्जाच्या मुदतपूर्व परतफेडीकरिता म्हणजेच दिनांक ३१.०८.२०१८ रोजी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास प्रदान करण्यात येणाऱ्या मुद्दल रुपये १४,८९,१५,०६१/- व व्याज रुपये ८१,१९,४८४/- असे एकूण रुपये १५,७०,३४,५४५/-(रुपये पंधरा कोटी सत्तर लाख चौतीस हजार पाचशे पंचेचाळीस फक्त) एवढे अनुदान सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना **खालील अटींवर** मुक्त करण्यात येत आहे.

अ) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी वरील मंजूर रकमेच्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

आ) ही मंजूर रक्कम त्यासाठी उघडण्यात आलेल्या वेगळया विनिर्दिष्ट खात्यामध्येच जमा करावी. तसेच ही रक्कम अन्य कोणत्याही कामासाठी वापरली जाणार नाही याची दक्षता घ्यावी. याबाबतची माहिती शासनास द्यावी.

इ) या मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राधिकरणाने द्यावयाची आहेत. त्यात दर्शविलेल्या खर्चाच्या रकमा प्राधिकरणाचे संचालक (वित्त) यांनी प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात व ती प्रमाणपत्रे प्राधिकरणाचे सदस्य सचिव यांना प्रतिस्वाक्षरीत कराव्यात. उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर आणि अधिदान व लेखा अधिकारी यांना पाठविण्यात याव्यात.

**ई)** या मंजूर अनुदानातून केलेल्या खर्चाच्या ताळमेळाची कार्यवाही महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने करावी व त्याबाबतचा अहवाल या विभागाकडे (कार्यासन क्र.पापु-२०) पाठवावा. तसेच रकमा कोषागारातून काढल्याची माहिती प्रमाणक क्रमांकासह या विभागाकडे पाठवावी.

२. परिच्छेद-१ नुसार रुपये १५,७०,३४,५४५/- (रुपये पंधरा कोटी सत्तर लाख चौतीस हजार पाचशे पंचेचाळीस फक्त) इतके मुक्त करण्यात आलेले अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या श्री. सु. से डांगे, संचालक (वित्त) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व श्री. य.टे. पाडवी, उप सचिव यांनी प्रतीस्वाक्षरी केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना सादर करावे. यासाठी, संचालक (वित्त) (श्री.सु. से डांगे), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री.य.टे.पाडवी) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील मंजूर रक्कम शासनाने उभारलेल्या कर्जावरील मुद्दल व व्याजाच्या प्रदानाची असल्याने तात्काळ इसीएस प्रणालीव्दारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. परिच्छेद २ मध्ये नमूद केल्याप्रमाणे रुपये १५,७०,३४,५४५/- (रुपये पंधरा कोटी सत्तर लाख चौतीस हजार पाचशे पंचेचाळीस फक्त) च्या अनुदानासाठी येणारा खर्च "लेखाशिर्ष, मागणी क्र-वाय-६, ४२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता यावरील भांडवली खर्च ०१, पाणी पुरवठा-१०१, नागरी पाणीपुरवठा- (००) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला भाग भांडवली अंशदान (योजनेत्तर ) (४२१५ ०१२५ ) ५४, गुंतवणुक" या लेखाशिर्षाखाली, सन २०१८-१९ या वर्षीच्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

४. या प्रस्तावास वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तीका,१९७८ भाग पहिला, उप विभाग-तीन येथील अनुक्रमांक ५ मधील नियम २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार मंजूरी देण्यात येत आहे. तसेच, हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दिनांक ०२.०४.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. वित्त विभागाने दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकानुसार नमूद केलेली ७० टक्के निधी वितरणाची मर्यादा या योजनेसाठी शिथील केली असून, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१९२/२०१८ व्यय ३ दिनांक २५.०७.२०१८ अन्वये १०० टक्के निधी या योजनेसाठी उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर अनुदान मंजूर करीत असतांना वरील अधिनियमांतर्गत वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मधील सर्व अटींची तसेच, सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १० मधील सर्व अटीची पूर्तता होत आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१४१५३३४५०७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Rawaji Khotare

Digitally signed by Pandurang Rawaji Khotare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f71ac87a049de582c5d577413de65742dfc38429fe3ee979d9ff3651730674c, serialNumber=241eb93ab449def8114b5fbff2ea51ab0f16e0092f0102aa9502d0457228dd65, cn=Pandurang Rawaji Khotare
Date: 2018.08.16 14:43:59 +05'30'

**( पां. रा. खोटरे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पुर्व), मुंबई-५१
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
३. संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
४. संचालक (वित्त) , महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.

५. मुख्य अभियंता, (कोकण विभाग), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -१ मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य - २ नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. वित्त विभाग,(अर्थ-१९/व्यय-३/अर्थोपाय/अर्थबळ) मंत्रालय, मुंबई - ४०० ३२.
१०. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ३२.
११.उपसचिव (पापु-०४)/ कार्यासन पापु-२० व संगणक कक्ष,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१२.निवडनस्ती, पापु-०४.